गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतर्गंत निधी वितरण करणेबाबत- जिल्हा- नागपुर.

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- गामुध २०२४/प्र.क्र.२५३ (निधी)/जल-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ७ ऑगस्ट,२०२४

**वाचा:-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल,२०२३.
२. शासन निर्णय,मृद व जलसंधारण विभाग क्र: जशिअ-२०२२/प्र.क्र ३०२/जल-७, दि. ०३.०१.२०२३
३. शासन निर्णय, मृद व जलसंधारण विभाग क्र: गामुध २०२२/प्र.क्र.२२/जल-१३ दि. २०.०४.२०२३
४. शासन पुरकपत्र, मृद व जलसंधारण विभाग क्र: गामुध २०२२/प्र.क्र.२२/जल-१३(जल १) दि. ०५.०२.२०२४
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
६. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपुर यांचे पत्र क्र. २०३३/तां.शा./२०२४, दि. ०१.०७.२०२४.

**प्रस्तावना:-**

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार ही योजना राज्यात कायमस्वरुपी राबविण्याचा निर्णय शासन निर्णय दि. २०.०४.२०२३ नुसार घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत विविध जिल्ह्यात गाळ काढण्याची कामे करण्यात आली आहेत. जलयुक्त शिवार २.० व गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेचा आढावा घेण्यासाठी मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २९.१२.२०२३ रोजी आयोजित बैठकीत झालेल्या निर्णयानुसार गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेची अंमलबजावणी करतांना अशासकीय संस्था उपलब्ध नसल्यास अशा वेळी ग्रामपंचायत मार्फत कामे करण्याबाबत विभागामार्फत तपासणी करण्याचे तसेच देयके अदा करण्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुलभता आणून जिल्हास्तरावर देयके अदा करण्याची कार्यपध्दती अवलंबविण्यात यावी, असे निर्देश सदर बैठकीत देण्यात आले आहे. त्यानुषंगाने राज्यात गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना अधिक सुलभतेने व गतीने

राबविण्यासाठी दि.२०.०४.२०२३ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्यात आली असून त्यासंदर्भात शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ निर्गमित करण्यात आले आहे.

शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ नुसार कार्यकारी अभियंता, मृद व जलसंधारण विभाग यांनी संबंधित अशासकीय संस्था/ग्रामपंचायतीस देयके जिल्हास्तरावर अदा करावीत. या योजनेसंदर्भात झालेल्या कामाची देयके अदा करण्याची कार्यवाही जिल्हास्तरावर करण्यात येणार आहे व त्यासाठी आवश्यक निधी शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार आहे. सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षासाठी या योजनेचा खर्च जलयुक्त शिवार २.० या योजनेच्या लेखाशिर्ष क्र ४४०२ २७८१ खाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु. ६५० कोटी या निधीमधून रु.५० कोटी एवढा निधी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेसाठी खर्च करण्यास मा. मुख्यमंत्री महोदयांनी मान्यता दिलेली आहे. त्यानुसार विभागाच्या संदर्भीय परिपत्रकानुसार सध्या उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून संदर्भीय क्र. ६ अन्वये प्राप्त निधी मागणी प्रस्तावांवर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतंर्गत नागपुर जिल्हयातील ५ जलसाठ्यांमधून अशासकीय संस्थानी गाळ काढण्याच्या कामांसाठीची देयके व शेतक-यांना शेतात गाळ पसरविण्यासाठी देण्यात येणारे अनुदान अदा करण्यासाठी **एकूण रु. २७,७०,३६४/- (रुपये सत्तावीस लक्ष सत्तर हजार तीनशे चौसष्ट फ़क्त)** इतका निधी "जोडपत्र अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-

अ) उपरोक्त निधी आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, औरंगाबाद यांनी तात्काळ संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांना वितरीत करावा. तसेच संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी सदर निधी सोबतच्या जोडपत्र अ नुसार कामनिहाय व यंत्रणेनुसार नमूद अशासकीय संस्थाना तात्काळ वितरीत करावा व त्याचा अनूपालन अहवाल शासन सादर करावा.

ब) संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी गाळ काढलेल्या कामाची व पंचनामा करुन गाळ नेणा-या शेतक-यांना अदा करावयाच्या अनुदानाची खातरजमा करुन, देयकाच्या आधारे निधीचे वितरण करण्यात यावे,

क) मंजूर (अदा करावयाच्या) निधीपेक्षा जास्तीची रक्कम अदा करण्यात येवू नये,

ड) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदरची रक्कम परस्पर अन्य कामासाठी वितरित न करता तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

इ) निधी वितरणासंबंधित गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजने संदर्भातील शासन निर्णयान्वये निर्धारित कार्यपध्दती व सुचनांचे/तरतुदींचे अनुपालन करण्यात आले असल्याबाबतची खातरजमा करण्यात यावी,

ई) वितरीत करण्यात येत असलेला निधी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार अंतर्गत झालेल्या कामासाठीच वितरीत करण्यात यावा,

ए) निधी वितरीत करताना संबंधित कामाबाबत तक्रार नसल्याची खातरजमा करावी,

ऐ) उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी तात्काळ खर्च करण्याबाबतची कार्यवाही करावी,

अं) गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेतर्गंत झालेल्या कामाच्या देयकांची छाननी व देयके तपासण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील,

आं) सदर निधी वितरण करतांना काही अनियमितता झाल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील,

३. सदर निधी मा. मुख्यमंत्री महोदयांनी या योजनेसाठी जलयुक्त शिवार योजनेच्या लेखाशिर्ष ४४०२ २७८१ अंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीमधून खर्च करण्यास दिलेल्या मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे.

४. याद्वारे संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांनी सदंर्भीय क्र ३ व ४ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार वर नमूद अशासकीय संस्थांना निधी वितरण करावे.

५. यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-झेडएच-५**

**(०२) जलयुक्त शिवार**

**(०२)(०१) जलयुक्त शिवार अभियान (कार्यक्रम) (४४०२ २७८१)**

**५३, मोठी बांधकामे**

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील तसेच तालुका स्तरावर उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहील.

७. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक दिनांक १२ एप्रिल, २०२३, दि.०८ डिसेंबर, २०२३, दिनांक १७ जानेवारी, २०२४, व दि. ०४ मार्च, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागाला दिलेल्या अधिकारास अनुसरून व नियोजन विभाग अनौ.सं.क्र.१६७/२४/१४३४, दि.३०.०९.२०२४ तसेच वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३८४/२०२४/व्यय-१५, दि.०५.०६.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच अर्थसंकल्प नियमपुस्तिका परिच्छेद १४२ नुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत असून, वित्त

विभागाच्या उपरोक्त सर्व परिपत्रकमधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

८. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०७१७४७५१४६२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.08.07 18:02:18 +05'30'

**( प्र. नि. पाटील )**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
२. जिल्हाधिकारी, नागपुर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपुर
४. अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपुर
५. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपुर
६. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नागपुर
७. जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद, नागपुर
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर/मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपुर
१०. कक्ष अधिकारी, कार्यासन जल-११, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती जल-१

**प्रत अग्रेषित:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
६. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
७. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक
९. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक

मृद व जलसंधारण विभाग

जोडपत्र 'अ'

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतर्गंत निधी वितरण करणेबाबत-जिल्हा- नागपुर

गोषवाराः-

शासन निर्णय क्रमांक: गामुध-२०२४/प्र.क्र- २५३(निधी)/जल-१ दिनांकः- ७ ऑगस्ट,२०२४

| अ.क्रं. | स्वयसेवी संस्था नांव/ग्रामपंचायत/ इत्तर | जलसाठ्यांची संख्या | जलसाठयातील काढलेल्या गाळाचा तपशिल | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | काढलेल्या गाळाचे परिमाण घमी. | स्तंभ ४ X रू. ३१/- + GST १८% + १% Insurance या प्रमाणे संस्थेस अदाकरावयाची रक्कम | अनुदानास पात्र शेतकरी संख्या | अनुदानास पात्र गाळाचे परिमाण घमी. | शेतात पारविलेल्या अनुदानास पात्र असलेल्या गाळाची रक्कम स्तंभ ७ X ३५.७५ | एकुण निधी मागणी रक्कम स्तंभ ५ + स्तंभ ८ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | ग्राम पंचायत चंदनपारडी ता. काटोल | १ | १३६२५.०० | ५०२६२६ | ० | ० | ० | ५०२६२६ |
| २ | शहरी व ग्रामीण विकास संस्था, नागपूर | ४ | ६१४७२.९६ | २२६७७३७.४९ | ०.०० | ०.०० | ०.०० | २२६७७३७.४९ |
| एकूण | | ५ | **७५०९९** | **२७७०३६४** | **०** | **०** | **०** | **२७,७०,३६४/-** |

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.08.07 18:02:32 +05'30'

( प्र. नि. पाटील )

कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव,

महाराष्ट्र शासन